**बागायती रोपमळयांचे बळकटीकरण करणे**
**ही राज्य पुरस्कृत योजना सन २००९-१० मध्ये**
**<u>राबविण्यास मान्यता देण्याबाबत</u>**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. रोवाब-४००९/ प्र.क्र. १९९/१३ अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२,**
**दिनांक : १८ डिसेंबर २००९**

**वाचा :-**

शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.११/का.६, दि.१७/११/२००९.

**प्रस्तावना :-**

राज्यात राबविण्यात येत असलेल्या रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत मुख्यत्वे शासकीय फळरोवाटिकेवरील कलमे/झाडे लाभार्थ्यांना पुरविण्यात येतात तसेच शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे यांना बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गतसुध्दा राज्यात मोठया प्रमाणावर मागणी आहे. या व्यतिरिक्त शेतक-यांना उत्कृष्ट वाणांच्या लागवड साहित्यांचा पुरवठा करणे, उच्चतंत्रज्ञानाची प्रात्यक्षिक प्रक्षेत्रे विकसित करणे, रोपवाटिकेवरील कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे, इत्यादी अनेक बाबींकरिता शासकीय रोपवाटिकांचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे. .

शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे उत्पादन व इतर माध्यमातून उत्पन्न मिळते. रोपवाटिकाची आर्थिक स्थिती सुधारण्याकरिता उपाययोजना अवलंबण्यात येत असून उत्पादनात वाढ होत आहे. राष्ट्रीय फलोत्पादन अभियान कार्यक्रमासाठी फळपिकाची कलमे/रोपे, भाजीपाला व फुलपिकांची रोपे यासाठी मोठा वाव असल्याने रोपवाटिकासाठी नियमित अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यामुळे सदर योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणे आणि जनजातीक्षेत्र उपयोजनेतंर्गत योजनेसाठी रु.१५.०० लाख इतका निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सदर राज्य योजना जनजाती क्षेत्र उपयोजनेंमध्ये राबविण्याकरिता येणारा खर्च आदिवासी विकास विभागाच्या उपरोक्त दि.१७/११/२००९ च्या शासन निर्णयान्वये जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत तरतूद रु. १५.०० लाख (रुपये पंधरा लाख फक्त) मधून खालील मंजूर लेखाशीर्षाखाली सन २००९-१० करिता मंजूर केलेल्या तरतूदींतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक टी -५
२४०१ - पीक संवर्धन,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना,
७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना,
राज्य योजनांतर्गत योजना,
(०१ ) (०१ ) बागायती रोपमळयांची स्थापना (२४०१ १४१९)
२१, सामग्री व पुरवठा

**३.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व त्याचे जिल्हानिहाय वितरण करण्यास **संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेला निधी आदिवासी उपयोजनेंतर्गत निधीचा विनियोग करण्याची जी मार्गदर्शक तत्वे विहित केलेली आहेत त्यानुसार प्रस्तुत निधी खर्च करण्यास संचालक (फलोत्पादन) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे

**४.** सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक- संकीर्ण-१००६/प्र.क्र.१३१/कोषा-प्रशा-५ दि.१५ मे,२००७ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करुन प्रधान सचिव (कृषि व फलो.) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २००९१२१८१९१९४५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**,

**( अनिल राणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे. (१० प्रती)
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (१० प्रती)
सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई /नागपूर,
महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. / वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसंकल्प -३/१२ )
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम
(कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.